**विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे अर्भक शस्त्रक्रियेबरोबरच बाल रुग्णांच्या (१ ते १४ वर्ष) शस्त्रक्रिया सेवेस मान्यता देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः विसंसे २०१४/प्र.क्र. १२०/आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३० जानेवारी, २०१७.

वाचा -

1. **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: जिरुस २६९६/प्र.क्र.१०५ /आरोग्य-३,दि.१२.०३.१९९६.**
2. **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: जिरुप २००५/१२९६/प्र.क्र.४२४ /आरोग्य-३, दि.१५.११.२००६.**

**प्रस्तावना-**

राज्याच्या ग्रामिण भागातील सर्वसामान्य जनतेस हृदयविकार, कर्करोग, मुत्रपिंडविकार तसेच गंभीर अपघातांमुळे संभवणा-या विकलांगता टाळण्यासाठी आवश्यक अतिविशिष्ट तज्ञ चिकित्सा सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी महसूल विभागाच्या मुख्यालयी विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये स्थापन करणेबाबत निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार नाशिक व अमरावती येथे विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये स्थापन करण्यात आली आहे. अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये या ठिकाणी पहिल्या टप्प्यात काही अतिविशिष्ट तज्ञ चिकित्सा सुविधा उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत. त्यानुसार विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अशा तज्ञ चिकित्सा सेवांमध्ये अर्भक शस्त्रक्रियेचा समावेश करण्यात आला आहे. अर्भक शस्त्रक्रियेमध्ये १ वर्षाखालील बालकांचा समावेश असल्यामुळे १ वर्षावरील बालरुग्णांच्या शस्त्रक्रियेकरीता प्रशासकीय अडचण निर्माण होत असल्याने या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासनाच्या दि.१५.११.२००६ च्या शासन निर्णयात याव्दारे सुधारणा करुन विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे पहिल्या टप्प्यात सुरु करण्यात आलेल्या मुत्रपिंड विकार उपचार/शस्त्रक्रिया

व मुत्रपिंड प्रत्यारोपन शस्त्रक्रिया, सुगठण शस्त्रक्रिया व अर्भक शस्त्रक्रिया या अतिविशिष्ट तज्ञ चिकित्सा सेवांमध्ये आता अर्भक शस्त्रक्रियेबरोबरच बालरुग्णांच्या (१ ते १४ वर्ष वय) शस्त्रक्रियेचाही समावेश करण्यास या शासन निर्णयान्वये पूर्वलक्षी प्रभावाने मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३०१५३१४३४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.01.30 17:20:51 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा, पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय,अमरावती.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
वित्त विभाग,(कार्यासन- विनियम ), मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)